रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० मधील प्रलंबित देयके अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः लेखानू-१०२०/प्र.क्र.४४/रेशीम कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२२.

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.प्रावियो-१०१८/प्र.क्र.१९/ रेशीम कक्ष, दिनांक १८ एप्रिल, २०१८.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.लेखानू-२०१९/प्र.क्र.७१/ रेशीम कक्ष, दिनांक २२ ऑगस्ट, २०१९.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.लेखानू-१०२०/प्र.क्र.४४/ रेशीम कक्ष, दिनांक ०८ डिसेंबर, २०२०.
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.लेखानू-१०२०/प्र.क्र.४४/ रेशीम कक्ष, दिनांक २४ फेब्रुवारी, २०२१.
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.लेखानू-१०२०/प्र.क्र.४४/ रेशीम कक्ष, दिनांक ०४ ऑगस्ट, २०२१.
६) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.लेखानू-१०२०/प्र.क्र.४४/ रेशीम कक्ष, दिनांक ०७ डिसेंबर, २०२१.
७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.लेखानू-१०२१/प्र.क्र.१०४/ रेशीम कक्ष, दिनांक २३ डिसेंबर, २०२१.
८) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र. रेशीम/कार्या-१०/प्रचार व प्रसिद्धी/प्र.दे./निधी मागणी/२०२१-२२/४०९, दिनांक २४ मार्च, २०२२.

प्रस्तावना :-

रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या वित्तीय वर्षात संदर्भाधीन दिनांक २२ ऑगस्ट, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये ₹ १९२.८३ लक्ष इतका निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात आली होती. तथापि, राज्यातील कोव्हीड-१९ च्या प्रादुर्भावामुळे संबंधितांकडून रेशीम संचालनालयास वेळेत देयके प्राप्त न झाल्यामुळे सन २०१९-२० या वित्तीय वर्षातील देयके प्रलंबित राहिली होती. रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमासाठी सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरिता अर्थसंकल्पीय तरतूदीच्या १० टक्के म्हणजेच ₹ १५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या वित्तीय वर्षातील प्रलंबित देयके अदा करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक ०४ ऑगस्ट, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये ₹ ८,५६,९२०/- व संदर्भाधीन दिनांक ०७ डिसेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये ₹ १,७०,०००/- तसेच, नागपूर

येथे आयोजित ॲग्रोव्हिजन कृषि प्रदर्शनी-२०२१ मध्ये रेशीम संचालनालयाचा स्टॉल लावण्यासाठी संदर्भाधीन दिनांक २३ डिसेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये ₹२,०९,९२०/- असा एकूण ₹१२,३६,८४०/- इतका निधी संचालक (रेशीम) यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. आता, प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या वित्तीय वर्षातील प्रलंबित राहिलेल्या प्राप्त देयकांची रक्कम अदा करण्यासाठी ₹१९,४७०/- इतका निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती संचालक (रेशीम) यांनी संदर्भाधीन दिनांक २३ मार्च, २०२२ च्या पत्रान्वये केली आहे. त्यामुळे, वित्त विभागाने यापूर्वी मंजूर केलेल्या १० टक्के (₹१५ लक्ष) निधीपैकी आतापर्यत वितरीत केलेला ₹१२,३६,८४०/- इतका निधी वजा जाता ₹२,६३,१६०/- इतका निधी विभागाकडे वितरणासाठी उपलब्ध आहे. सबब, रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या वित्तीय वर्षातील प्रलंबित देयकांचा खर्च भागविण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या वित्तीय वर्षातील प्रलंबित देयके अदा करण्यासाठी ₹१९,४७०/- (अक्षरी रुपये एकोणीस चारशे सत्तर फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. सदर निधीचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल व शासनास विहित मुदतीत सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी लेखाधिकारी, रेशीम संचालनालय, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच, संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V003) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर यांच्या अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे.

४. उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ००, १०७, रेशीम उद्योग, (०१) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०१)(०१) राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिद्धी (कार्यक्रम) (२८५१६५७४), २६, जाहिरात व प्रसिद्धी" अंतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ / विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-१, अ.क्र.६, नियम क्रमांक ४० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या

अधिकारानुसार तसेच, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३४४/२०२१/व्यय-२, दि.०९.०७.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२९१५०५५५२९०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR DAULAT PATIL

Digitally signed by KISHOR DAULAT PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=800eadd0439866ccccf42ae63d94e1c7678124d2496cc90252be5707ed3de3f3, pseudonym=EC7EBA9942E9F48AE6C4CC1914098CEDF969D21E, serialNumber=4ACEBAE058F9790422D1385B04BAA7B606C3951CA0FDE91204ACE3BB2EE4B2C5, cn=KISHOR DAULAT PATIL
Date: 2022.03.29 15:09:06 +05'30'

**( कि. दौ. पाटील )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
५) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) कोषागार अधिकारी, नागपूर.
८) उपसंचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, औरंगाबाद.
९) सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, नागपूर/अमरावती/पुणे.
१०) निवड नस्ती (रेशीम कक्ष).